**टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठातील शिक्षकेत्तर कर्मचा-यांना ३०० दिवस रजा रोखीकरण मंजूर करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण २०१३/(४९/२०१३) विशि-४**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: २.१२.२०१४

<u>वाचा :-</u>

**१) शासन निर्णय क्रमांकः आरएसआय-१२८८/(१३०३) विशि-१,दि.२ सप्टेंबर १९९७**

**२) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकःअरजा २४०१/८/सेवा-९, दि. १५ जानेवारी २००१**

**३) शासन निर्णय क्रमांकः टिमवि १०९८/(२२६)/विशि-१, ९ जानेवारी २००१**

**४) शासन निर्णय क्रमांकःटिमवि-२००९/(२३२/०९)/विशि-४, ६ ऑक्टोबर २०१०**

**५) शासन निर्णय क्रमांकःटिमवि २००९/(२३२/०९)/विशि-४, २७ सप्टेंबर २०११**

<u>प्रस्तावना :-</u>

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठास केंद्र शासनाने १९८७ मध्ये अभिमत विद्यापीठाचा दर्जा दिला आहे. त्यानुसार शासनाने दिनांक २ मे, १९९२ च्या शासन निर्णयानुसार ५२ शिक्षकेत्तर पदे मंजूर केलेली आहेत. सदर संस्थेतील शिक्षकेत्तर व शिक्षकीय पदे वेतन अनुदान योजने खाली आणण्यात आलेली आहे. त्यानुसार शासनाने संस्थेतील शिक्षकेत्तर कर्मचा-यांना ६ वा वेतन आयोग लागू केलेला आहे. टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठातील शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या अर्जीत रजेचे रोखीकरण करण्याची कमाल मर्यादा ३०० दिवसापर्यंत वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठास शासनाकडून परिरक्षण अनुदान प्राप्त होते. त्याचप्रमाणे संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सदर अभिमत विद्यापीठास ४ था वेतन लागू केला असून शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांची पदे वेतन अनुदान योजने खाली आणलेली आहेत. शासनाने विद्यापीठास ५ वा व ६ वा वेतन आयोगही संदर्भ क्र. ३ व ५ शासन निर्णयान्वये लागु केला आहे.

शासन निर्णय वित्त विभाग क्रमांकःअरजा २४०१/८/सेवा-९, दि. १५ जानेवारी २००१ अन्वये अर्जीत रजा राखीकरणाची मर्यादा २४० दिवसा वरुन ३०० दिवस केली आहे. या पार्श्वभूमिवर टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठाने रजा रोखीकरणाची मर्यादा सध्याच्या रजा रोखी करणावरुन ३०० दिवसापर्यंत वाढविण्याचा प्रस्ताव संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांच्या मार्फत

शासनास सादर केला होता. त्यास अनुसरुन टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, पुणे या अभिमत विद्यापीठास शिक्षकेत्तर कर्मचा-यांना रजा रोखीकरणाची कमाल मर्यादा ३०० दिवस करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२४४/सेवा६, दिनांक १८ जुलै २०१४ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११२५१५२३३०४८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Rawoo Kadam

Digitally signed by Prakash Rawoo Kadam
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prakash Rawoo Kadam
Date: 2014.12.04 10:54:55 +05'30'

**(प्र.रा.कदम)**

शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. संचालक व सर्व विभागीय शिक्षण सह संचालक, उच्च शिक्षण
२. सर्व विभागीय सह संचालक, तत्र शिक्षण
३. महालेखापाल-१ (लेखा विभाग), महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई
५. महालेखापाल-२(लेखा परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर
६. महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, नागपूर
७. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई/निवासी लेखा परीक्षा अधिकारी
८. कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
९. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे
१०.वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
११.मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्ष्ंण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
१२.उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व कार्यासने
१३.निवड नस्ती (विशि-४)